ठाणे जिल्ह्यातील भिवंडी येथे जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय व दिवाणी न्यायालय, वरिष्ठ स्तर, ही दोन न्यायालये स्थापन करणे व त्याकरीता आवश्यक पदे निर्माण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: न्यास्थाप ०५२२/४८८/प्र.क्र.७१/कार्यासन ११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २९ मार्च, २०२३

<u>वाचा</u> :-१. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांची क्र. No: B(W)A-१२२३/१९९८, दि.११/५/२०१२,
क्र. No: B(W)A-१२२३/१९९३/९९७/१५१९८, दि.२/५/२०२२ ची पत्रे.
२. जिल्हा न्यायालय, ठाणे यांचे पत्र क्र. प्रशा/२९३२/२०२२, दि.२२/४/२०२२
३. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे पत्र क्र.पदनि- २०२२/प्र.क्र.३८/आपुक,दि.१२/१२/२०२२ ( पदनिर्मितीबाबत कार्यवृत्त)
४. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे पत्र क्र. पदनि- २०२२/प्र.क्र.४८/ आपुक, दि.३०/१२/२०२२ ( पदनिर्मितीबाबत कार्यवृत्त)
५. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि २०२२/प्र.क्र.१५/आ.पु.क. दि.२७/४/२०२२

**<u>प्रस्तावना:-</u>**

मा. उच्च न्यायालयाच्या दि. ४/४/२००७ च्या मानक प्रारुपानुसार (Standard Format) राज्यात विविध ठिकाणी नवीन न्यायालय सुरु करण्यासाठी प्रलंबित खटले / प्रकरणांची संख्या किमान ५०० असावी. त्याचबरोबर पायाभूत सुविधा उदा. न्यायालयीन इमारत आणि न्यायाधीशांची निवासस्थाने यांची उपलब्धता असावी. मा.उच्च न्यायालयाच्या धोरणानुसार आवश्यक सर्व निकष पूर्ण होत असल्याने भिवंडी, जिल्हा ठाणे येथे जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय व दिवाणी न्यायालय, वरिष्ठ स्तर ही दोन न्यायालये स्थापन करण्यास मा. उच्च न्यायालयाच्या “न्यायालय स्थापना समितीने” मान्यता दिली आहे. सदर प्रस्तावास मा. मंत्रिमंडळाने मान्यता दिल्यानुसार सदर न्यायालये स्थापन करण्यास व त्याअनुषंगाने पदनिर्मिती बाबतचे आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

भिवंडी, जिल्हा ठाणे येथे जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय हे न्यायालय स्थापन करण्यास व त्याकरीता न्यायालय सुरु होण्याच्या दिनांकापासून पुढील विवरणपत्रामध्ये दर्शविल्यानुसार १९ नियमित पदे निर्माण करण्यास व ६ मनुष्यबळांच्या सेवा बाहययंत्रणेद्वारे घेण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

**अ) जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय, भिवंडी, जि.ठाणे**

नियमित पदे (अस्थायी)

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | जिल्हा न्यायाधीश, | Pay in Judiciary Services | १ |
| २ | अधिक्षक | एस- १६ : ४४९००-१४२४०० | १ |
| ३ | लघुलेखक (ग्रेड-१) | एस-१७ : ४७६००-१५११०० | १ |

| | | | |
|---|---|---|---|
| ४ | वरिष्ठ लिपीक | एस-८ : २५५००-८११०० | ४ |
| ५ | कनिष्ठ लिपीक | एस-६ : १९९००-६३२०० | ९ |
| ६ | बेलिफ | एस-६ : १९९००-६३२०० | ३ |
| **एकूण पदे** | | | **१९** |

**बाह्ययंत्रणेद्वारे घ्यावयाच्या सेवा**

| अ.क्र. | सेवा | मनुष्यबळ संख्या |
|---|---|---|
| १ | पुस्तक बांधणीकार | १ |
| २ | शिपाई | २ |
| ३ | पहारेकरी | १ |
| ४ | सफाईगार | १ |
| ५ | वाहनचालक | १ |
| **बाह्ययंत्रणेद्वारे एकूण मनुष्यबळ** | | **६** |

२. तसेच भिवंडी, जिल्हा ठाणे येथे दिवाणी न्यायालय, वरिष्ठ स्तर हे न्यायालय स्थापन करण्यास व त्याकरीता न्यायालय सुरु होण्याच्या दिनांकापासून पुढील विवरणपत्रामध्ये दर्शविल्यानुसार १६ नियमित पदे निर्माण करण्यास व ४ मनुष्यबळांच्या सेवा बाहययंत्रणेद्वारे घेण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

**ब) दिवाणी न्यायालय (वरिष्ठ स्तर), भिवंडी, जि.ठाणे.**

**नियमित पदे (अस्थायी)**

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणीPay in Judiciary Services | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | दिवाणी न्यायाधीश, वरिष्ठ स्तर | Pay in Judiciary Services | १ |
| २ | अधिक्षक | एस-१६ : ४४९००-१४२४०० | १ |
| ३ | सहायक अधीक्षक | एस-१५ : ४१८००-१३२३०० | २ |
| ४ | लघुलेखक (ग्रेड-२) | एस-१५ : ४१८००-१३२३०० | १ |
| ५ | वरिष्ठ लिपीक | एस-८ : २५५००-८११०० | २ |
| ६ | कनिष्ठ लिपीक | एस-६ : १९९००-६३२०० | ६ |
| ७ | बेलिफ | एस-६ : १९९००-६३२०० | ३ |
| **एकूण पदे** | | | **१६** |

**बाह्ययंत्रणेद्वारे घ्यावयाच्या सेवा**

| अ.क्र. | सेवा | मनुष्यबळ संख्या |
|---|---|---|
| १ | शिपाई | २ |
| २ | पहारेकरी | १ |
| ३ | सफाईगार | १ |
| **बाह्ययंत्रणेद्वारे एकूण मनुष्यबळ** | | **४** |

बाह्ययंत्रणेद्वारे सेवा घेताना, वित्त विभागाच्या दि.२७/४/२०२२ च्या शासन परिपत्रकातील मार्गदर्शक सूचनांचे पालन करण्याची दक्षता घ्यावी.

२. यासाठी होणारा खर्च"मागणी क्र. जे-१, २०१४, न्यायदान, १०५ दिवाणी व सत्र न्यायालय, (०२) जिल्हा व सत्र न्यायाधीश,(०२) (०१) जिल्हा व सत्र न्यायाधीश (२०१४ ०१७२) (दत्तमत) (अनिवार्य)" या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. या अनुषंगाने निधी उपलब्धतेबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व अनौपचारिक संदर्भ क्र.६१०/आपुक, दि.३१/१०/२०२२ व अनौपचारिक संदर्भ क्र. ३०५/व्यय ५, दि.२७/३/२०२३अन्वये तसेच दि.२/३/२०२३ रोजी झालेल्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत झालेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३२९१६१६३७८४१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NITIN V JIWANE

Digitally signed by NITIN V JIWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d471400fbcfb074e051, pseudonym=00D295F198C67FDB7031897066C5804DA623172E, serialNumber=38DA45FC182DE9210D4220CD41371018A4D6F00892E5D1478CBA8413AFB06C03, cn=NITIN V JIWANE
Date: 2023.03.29 16:21:24 +05'30'

**( नि.वि.जिवने )**
विधि सल्लागार- नि- सह सचिव

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री , महाराष्ट्र शासन यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
४. मा. विरोधीपक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद.
५. सर्व विधानमंडळ सदस्य, विधानमंडळ, मुंबई.
६. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
८. महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने)
९. प्रबंधक (निरीक्षणे- १) , मा.उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने)
१०. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जिल्हा व सत्र न्यायालय, ठाणे.
११. जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायाधीश, भिवंडी, जि. ठाणे
१२. दिवाणी न्यायाधीश, वरिष्ठ स्तर, भिवंडी, जि. ठाणे
१३. महालेखापाल (लेखापरिक्षा व लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, जि. ठाणे
१५. वित्त विभाग, कार्यासन-व्यय-५ / आ.पु.क./सेवा ९, मंत्रालय, मुंबई.
१६. कार्यासन-१३,२०,२३, व २४, विधि व न्याय विभाग,मंत्रालय, मुंबई.
१७. निवडनस्ती.